वार्षिक योजना सन २०२३-२४ प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९) या लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावनि-२०२३/प्र.क्र.३६/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १६ जून, २०२३

वाचा:-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.८९/फ-११, दिनांक १४.०२.२०२३
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.८९/फ-११, दिनांक २७.०२.२०२३
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सावनि-२०२२/प्र.क्र.८९/फ-११, दिनांक ३१.०३.२०२३
४)वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/नबाप्र/प्र.क्र.३५/१८८/२३-२४, दिनांक ०९.०६.२०२३

प्रस्तावना :-

संदर्भाधीन क्रमांक १ येथील नमूद दिनांक १४.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९) या योजनेसाठी सन २०२२-२३ करिता प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९) या लेखाशीर्षांतर्गत माध्यम आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सन २०२२-२३ करिता खालीलप्रमाणे नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला होता:-

(रु.लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नांव | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६८५८९) | २६-जाहिरात व प्रसिध्दी | १४००.०० |
| | | ५०-इतर खर्च | ६००.०० |
| | | **एकूण** | **२०००.००** |

तसेच सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मुख्य लेखाशिर्ष (२४०६ ८५८९) प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण सविस्तर शिर्ष २६ जाहिरात व प्रसिध्दी अंतर्गत संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील नमूद शासन निर्णय दिनांक २७.०२.२०२३ व दिनांक ३१.०३.२०२३ अन्वये अनुक्रमे रू.१२००.०० लक्ष व रू.२११.०५ लक्ष असा एकुण रु.१४११.०५ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र.५ येथील नमूद पत्रान्वये शासनास सादर केलेल्या चालू बाब प्रस्तावाच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या भाग- (अ) मधील अ.क्र.१ ते १०, भाग-(ब) मधील अ.क्र.११ ते १५ व भाग (क) मधील अ.क्र.१ ते ३ येथील नमूद कामे ही सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सुरू करण्यात आली व पूर्ण करण्यात आली असून सदर कामांच्या देयकांची अदायगी पूर्ण झाली नसल्यामुळे एकूण रु.५८६.८२ लक्ष इतकी रक्कम सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९) या योजनेकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू.४०००.०० लक्ष नियतव्ययामधून संदर्भाधीन क्रमांक ४ येथे नमूद वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १२.०४.२०२३ मधील निश्चित करण्यात आलेल्या २०% मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र.५ येथील नमूद पत्रान्वये शासनास सादर केलेल्या चालू बाब प्रस्तावास अनुसरून प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९) या योजनेसाठी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ .क्र. | योजनेचे नाव | उद्दिष्ट | सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पित निधी | २०% मर्यादेच्या अनुषंगाने निधी | निधी वितरणास मान्यता |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण ( २४०६८५८९) | २६-जाहिरात व प्रसिध्दी | २८००.०० | ५६०.०० | **४१०.७८** |
| | | ५०-इतर खर्च | १२००.०० | २४०.०० | **१७६.०४** |
| | | एकूण | ४०००.०० | ८००.०० | **५८६.८२** |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात

आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे वर्ष २०२३-२४ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-७,**
**२४०६ वनीकरण व वन्यजीवन, ( योजनांतर्गत ) ०१ वनीकरण,**
**००३ शिक्षण व प्रशिक्षण ( ००)(०३)**
**(००)(०३) प्रचार, प्रसिध्दी व प्रशिक्षण (२४०६ ८५८९), २६ जाहिरात व प्रसिध्दी ५०- इतर खर्च**

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६१६१८२००८२२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.06.16 18:21:18 +05'30'

**( विनायक बा. इंगळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण (६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी, मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.